राज्यात ई-चलान प्रकल्प राबविण्यासाठी
सल्लागार म्हणून नियुक्त केलेल्या मे. केपीएमजी
कंपनीस मुदतवाढ देण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीसीटी-३६१९/प्र.क्र.३६/पोल-३,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ जून, २०२३

वाचा:-

(१) माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, शासन निर्णय क्रमांक: GAD-मातंस०८०/४/२०१४-O/O Directorate of IT-DIT(MH), दि.१.७.२०१४ व दि.९.५.२०१९ दिनांक २४.४.२०२३
(२) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक: गृहआ-२०१५/प्र.क्र.२३०/आस्था-२, दिनांक २०.५.२०१५.
(३) अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक २३.८.२०१६ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
(४) गृह विभाग, कार्यादेश क्रमांक टीआरए / १२१३ / प्र.क्र.९/शिकाना/पोल-८, दिनांक ६.९.२०१६
(५) अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दिनांक ५.३.२०१९, दिनांक ३१.५.२०२१ व दिनांक २७.५.२०२२ व दिनांक २०.४.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
(६) गृह विभाग, शासन निर्णय सीसीटी३६१९/प्र.क्र.३६/पोल-३, दिनांक ७.८.२०१९, दिनांक २१.९.२०२१, दिनांक १८.८.२०२२.
(७) अपर पोलीस महासंचालक, (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.एडीजीपी (टीआर) / ४५ /ई-चलान/४५/२०२३, दिनांक ४.१.२०२३

**प्रस्तावना :**

ई-चलान प्रकल्पासाठी दिनांक १०.९.२०१६ ते दिनांक १०.२.२०१७ या कालावधीसाठी मे.केपीएमजी यांची प्रकल्प सल्लागार म्हणून संदर्भ क्र.४ येथील कार्यादेशानुसार नियुक्ती करण्यात आली होती. गृह विभाग, शासन निर्णय दिनांक ७.८.२०१९ अन्वये मे. केपीएमजी कंपनीस प्रकल्प सल्लागार म्हणून दिनांक १०.२.२०१७ ते दिनांक ३०.९.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. तसेच गृह विभाग, शासन निर्णय दिनांक २१.९.२०२१ अन्वये मे.केपीएमजी कंपनीस प्रकल्प सल्लागार म्हणून दिनांक १.१०.२०२० ते दिनांक ३०.११.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. तद्नंतर गृह विभाग, शासन निर्णय दिनांक १८.८.२०२२ अन्वये मे. केपीएमजी कंपनीस प्रकल्प सल्लागार म्हणून दिनांक १.१२.२०२१ ते दिनांक ३१.१२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दिनांक २०.४.२०२३ रोजीच्या बैठकीत प्रकल्प सल्लागार यांना मुदतवाढ देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे, त्या अनुषंगाने आदेश निर्गमित करणे विचाराधीन होते.

**शासन निर्णय :**

उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दिनांक २०.४.२०२३ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार ई-चलान प्रकल्पासाठी सल्लागार म्हणून मे. केपीएमजी कंपनीच्या एका वरिष्ठ सल्लागारास दिनांक १.१.२०२३ ते दिनांक ३०.६.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

उपरोक्त सल्लागारांना देण्यात येणारे मानधन व इतर भत्ते माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथे नमूद दिनांक ९.५.२०१९ व दिनांक २४.४.२०२३ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार देय राहील तथापि, माहिती व तंत्रज्ञान विभागाने सल्लागारांच्या मानधनासंदर्भात भविष्यात काही सुधारणा केल्यास सदर सुधारणा उपरोक्त सल्लागारांना लागु राहतील. तसेच त्यासाठी माहिती व तंत्रज्ञान विभागाने सदर कंपनीची नेमणूक (Empanelment) करणे आवश्यक राहील.

सर्व सल्लागारांना देण्यात येणारे मानधन हे Man-Month/Quarterly Milestone तत्वानुसार असेल. सल्लागाराची देयके शासनास सादर करताना सल्लागाराने महिन्याच्या / तिमाहीच्या कालावधीत केलेल्या कामाचा तपशील/अहवाल शासनास सादर करणे आवश्यक आहे.

ई-चलान प्रकल्पासाठी नेमण्यात आलेल्या सल्लागारांच्या मानधनाबाबतचा खर्च पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिनस्त असलेल्या "मागणी क्र. बी-१, २०५५-पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (०१) जिल्हा पोलीस बल, १३, कार्यालयीन खर्च (२०५५ ०१६८)" या लेखाशीर्षाखाली उपलब्ध अनुदानातूतन भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६२११२११४९२७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2023.06.21 12:14:06 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

(१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
(२) अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
(३) प्रधान महालेखाकार (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
(४) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
(५) अपर पोलीस महासंचालक, वाहतूक, मुंबई.
(६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
(७) विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर, मुंबई.
(८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
(९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
(१०) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई.
(११) कक्ष अधिकारी, व्यय-७ / वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
(१२) मे.केपीएमजी ॲडव्हायझरी सर्व्हीसेस प्रा.लि., मुंबई.
(१३) अर्थ शाखा गृह विभाग.
(१४) निवड नस्ती / पोल-३.